**महाराष्ट्र राज्यातील ५० गुणवत्ताधारक मुलींना IIT /JEE आणि इंटरनॅशनल ऑलिम्पीयाड इ. स्पर्धात्मक परीक्षांच्या पूर्वतयारीसाठी IIT॰ians PACE या संस्थेमार्फत मोफत प्रशिक्षण देण्याकरिता निधी उपलब्ध करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०११/प्र.क्र.२१३/का-०३**
नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०५ ऑगस्ट, २०१५.

वाचा :- शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्रमांक- संकीर्ण-२०११/प्र.क्र.२१३/का-०३, दिनांक ०९ जुलै, २०१३.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील ५० गुणवत्ताधारक मुलींना IIT /JEE आणि इंटरनॅशनल ऑलिम्पीयाड इ. स्पर्धात्मक परीक्षांच्या पूर्वतयारीसाठी IIT॰ians PACE या संस्थेमार्फत मोफत प्रशिक्षण देण्याबाबतच्या खर्चास शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-२०११/प्र.क्र.२१३/का-०३, दिनांक ०९ जुलै, २०१३अन्वये मान्यता दिलेली आहे. सदर प्रशिक्षण देण्याबाबत आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे आणि IIT॰ians PACE, अंधेरी, मुंबई यांच्यामध्ये करार झाला आहे.

सन २०१४- १५ या आर्थिक वर्षात IIT॰ians PACE, अंधेरी, मुंबई यांना महाराष्ट्र राज्यातील ५० गुणवत्ताधारक मुलींना IIT /JEE आणि इंटरनॅशनल ऑलिम्पीयाड इ. स्पर्धात्मक परीक्षांच्या पूर्वतयारीसाठी IIT॰ians PACE या संस्थेमार्फत मोफत प्रशिक्षण देण्याबाबत २२३५-बी १९२ या लेखाशिर्षाखाली एकूण ₹ १६,७४,३००/- (अक्षरी रुपये सोळा लक्ष चौऱ्याहत्तर हजार तीनशे फक्त) निधी प्राप्त झाला होता. सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी शासनास सादर केले आहे. सन २०१५-१६ साठी २२३५-बी १९२ या लेखाशिर्षाखाली ७० टक्के मर्यादेतील तरतूद आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना वितरित करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यावर शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्यातील ५० गुणवत्ताधारक मुलींना IIT /JEE आणि इंटरनॅशनल ऑलिम्पीयाड इ. स्पर्धात्मक परीक्षांच्या पूर्वतयारीसाठी IIT॰ians PACE या संस्थेमार्फत मोफत प्रशिक्षण देणेबाबत या योजने अंतर्गत उपलब्ध करुन द्यावयाच्या निधीमधून २२३५-बी १९२ या लेखाशिर्षाखाली ७० टक्के मर्यादेतील

तरतूद ₹७९३,८००/- (अक्षरी रुपये सात लक्ष त्र्याण्णव हजार आठशे फक्त) इतका निधी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. याकरीता आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी विहित नियमानुसार हा निधी IITians PACE, अंधेरी, मुंबई यांना वितरित करावा व सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

३. हा खर्च मागणी क्रमांक एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०२, बाल कल्याण, (१३) (०१) शैक्षणिक संस्थांना अनुदान, महाराष्ट्र राज्यातील ५० गुणवत्ताधारक मुलींना IIT / JEE आणि इंटरनॅशनल ऑलिम्पियाड इ. अशा स्पर्धात्मक परीक्षांच्या पूर्वतयारीसाठी योजना (२२३५ बी १९२) ३१ सहायक अनुदान या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतुदीतुन भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०६१०४६३४६९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahendra Babusing Hajari

Digitally signed by Mahendra Babusing Hajari
DN: CN = Mahendra Babusing Hajari, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Reason: I am the author of this document
Date: 2015.08.07 11:25:07 +05'30'

**म. बा. हजारी**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर.
७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

